राज्यातील शासकीय वैद्यकीय महाविद्यालये आणि जिल्हा रूग्णालयांमध्ये DNB अभ्यासक्रमाच्या जागा निर्माण करण्याबाबत.

# महाराष्ट्र शासन

## वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग

शासन निर्णय क्रमांक.एमईडी-१०२३/प्र.क्र.२१९/२३/शिक्षण-२

गो.ते.रुग्णालयाची नवीन इमारत, ९ वा मजला, गो.ते. रुग्णालय संकुल,

लोकमान्य टिळक मार्ग, नवीन मंत्रालय,मुंबई ४०० ००१

दिनांक:- २९/०५/२०२३

**प्रस्तावना :-** सध्या राज्यातील शासकीय वैद्यकीय महाविद्यालयामध्ये राष्ट्रीय आयुर्विज्ञान आयोग मान्यताप्राप्त वैद्यकीय पदव्युत्तर अभ्यासक्रमाच्या (MD/MS) जागा उपलब्ध आहेत. तसेच काही जिल्हा रूग्णालयांमध्येदेखील राष्ट्रीय परीक्षा मंडळ (NBE) अंतर्गत DNB अभ्यासक्रमाच्या जागा उपलब्ध आहेत. शासकीय वैद्यकीय महाविद्यालयामध्ये ज्या विषयांत MD/MS च्या जागा उपलब्ध नाहीत, तेथे DNB अभ्यासक्रमाच्या जागा निर्माण करणे शक्य आहे. तसेच जिल्हा रुग्णालयांमध्येही DNB अभ्यासक्रमाच्या जागांत वाढ करता येऊ शकेल. सदर वैद्यकीय पदव्युत्तर अभ्यासक्रमाच्या अतिरिक्त जागा निर्माण झाल्यास त्यामुळे राज्याच्या आरोग्य सेवेत हातभार लागून सामान्य जनतेच्या रुग्णोपचाराकरिता अतिरिक्त मनुष्यबळ उपलब्ध होऊ शकते. तसेच यामुळे वैद्यकीय महाविद्यालयांसाठी अतिरिक्त शिक्षकवर्गही निर्माण होईल. सदर पार्श्वभूमीवर राज्यातील शासकीय वैद्यकीय महाविद्यालये आणि जिल्हा रूग्णालयांमध्ये DNB अभ्यासक्रमाच्या अतिरिक्त जागा निर्माण करण्याच्या अनुषंगाने अभ्यास करण्यासाठी एक समिती गठीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-** राज्यातील शासकीय वैद्यकीय महाविद्यालये आणि जिल्हा रूग्णालयांमध्ये DNB अभ्यासक्रमाच्या अतिरिक्त जागा निर्माण करण्याच्या अनुषंगाने शासनास शिफारशी करण्यासाठी पुढील प्रमाणे समिती गठीत करण्यात येत आहे:-

| | | |
|---|---|---|
| १) | कुलगुरू,<br>महाराष्ट्र आरोग्य विज्ञान विद्यापीठ, नाशिक | अध्यक्ष |
| २) | डॉ.नितीन अंबाडेकर, संचालक-०२,<br>आरोग्य सेवा संचालनालय, पुणे | सदस्य |
| ३) | डॉ.अजय चंदनवाले, सहसंचालक (वैद्यकीय),<br>वैद्यकीय शिक्षण व संशोधन संचालनालय, मुंबई | सदस्य |
| ४) | डॉ.राकेश वाघमारे, सहायक प्राध्यापक,<br>आरोग्य पथक, पालघर | सदस्य सचिव |

२. सदर समितीव्दारे राज्यातील शासकीय वैद्यकीय महाविद्यालये आणि जिल्हा रुग्णालयांमध्ये DNB अभ्यासक्रम सुरू करण्यासाठी National Board of Examinations च्या मानकांनुसार आवश्यक सुविधांचा आढावा घेऊन त्याद्वारे DNB या वैद्यकीय पदव्युत्तर अभ्यासक्रमाच्या राज्यात अतिरिक्त किती जागा निर्माण होऊ शकतील याबाबत शासनास शिफारशी सादर करण्यात येतील.

**३.** या संदर्भात समितीने आयुक्त, वैद्यकीय शिक्षण यांचेमार्फत शासनास १५ दिवसांत अहवाल सादर करणे आवश्यक राहील.

**४.** उक्त समिती सदस्यांनी त्यांचे नियमित कामकाज सांभाळून समितीचे कामकाज पाहणे आवश्यक राहील. त्याकरिता त्यांना कोणतेही अतिरिक्त मानधन व भत्ते अनुज्ञेय राहणार नाहीत.

**५.** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०५२९१७५३१५८७१३ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

AJIT TUKARAM SASULKAR

Digitally signed by AJIT TUKARAM SASULKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=MEDICAL EDUCATION AND DRUGS DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra,
2.5.4.20=09df106c443b4977e7463338fa58f736fdb4fe137863b178345a5ead34dbfb12, pseudonym=8433B0910FFD44AC77C267452786D497C8BC73E0, serialNumber=71214F99804ABAAE1EA28D5F794C1BA337889880D0C567C29D025934340956DF, cn=AJIT TUKARAM SASULKAR
Date: 2023.05.29 20:01:51 +05'30'

**(अजित सासुलकर)**

**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. मा.राज्यपाल यांचे सचिव, राज्यपाल सचिवालय, राज भवन, मलबार हिल, मुंबई
२. मा.सभापती, महाराष्ट्र विधानपरिषद, मुंबई यांचे सचिव, विधान भवन, मुंबई
३. मा.अध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा, मुंबई यांचे सचिव, विधान भवन, मुंबई
४. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
५. मा.मंत्री (वैद्यकीय शिक्षण) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
६. मा. विरोधी पक्ष नेता, महाराष्ट्र विधानपरिषद यांचे सचिव, विधान भवन, मुंबई
७. मा.विरोधी पक्ष नेता, महाराष्ट्र विधानसभा यांचे सचिव, विधान भवन, मुंबई
८. मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई
९. अपर मुख्य सचिव, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई
१०. अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
११. अपर मुख्य सचिव, सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई
१२. प्रधान सचिव, विधि व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई
१३. सचिव, वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग, मंत्रालय, मुंबई
१४. आयुक्त, आरोग्य सेवा, आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई
१५. आयुक्त, वैद्यकीय शिक्षण, मुंबई
१६. कुलगुरू, महाराष्ट्र आरोग्य विज्ञान विद्यापीठ, नाशिक
१७. डॉ.नितीन अंबाडेकर, संचालक-०२, आरोग्य सेवा संचालनालय, पुणे
१८. डॉ.अजय चंदनवाले, सहसंचालक, वैद्यकीय शिक्षण व संशोधन संचालनालय, मुंबई
१९. डॉ.राकेश वाघमारे, सहायक प्राध्यापक, आरोग्य पथक, पालघर
२०. महासंचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई
२१. निवडनस्ती (शिक्षण-२)